मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांनी अनधिकृत बांधकामावर कारवाई करण्यासंदर्भात दिलेल्या निर्देशाची राज्यातील सर्व नागरी स्थानिक संस्थांमध्ये अंमलबजावणी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२४/प्र.क्र. ४५२/नवि-२०**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २५ एप्रिल, २०२५.

**-: परिपत्रक :-**

**वाचा -**

१) मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांचे दि.१३ नोव्हेंबर, २०२४ रोजीचे निर्देश.
२) मा.मुख्य सचिव कार्यालय, महाराष्ट्र शासन यांचे दि.०१.०१.२०२५ रोजीचे पत्र.
३) मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांचे दि.१७ डिसेंबर, २०२४ रोजीचे निर्देश.
४) मा.मुख्य सचिव कार्यालय,महाराष्ट्र शासन यांचे दि.०४.०२.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना**

मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली येथे जमियत उलमा इ.हिंद (Jamiat Ulama I Hind) यांनी उत्तर दिल्ली महानगरपालिका व इतर (North Delhi Municipal Corporation & Ors) यांच्या विरुध्द रिट याचिका (दिवाणी) क्र.२९५/२०२२,रिट याचिका (दिवाणी) क्र.३२८/२०२२ व रिट याचिका (फौजदारी) क्र.१६२/२०२२ दाखल केली आहे. सदर याचिकेच्या संदर्भात दि.१३ नोव्हेंबर,२०२४ रोजी मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली यांनी अनधिकृत बांधकामावर कारवाई करण्यासंदर्भात निर्देश दिले आहेत. सदरचे निर्देश शासन परिपत्रकान्वये सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांना कळविण्याच्या सूचना मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांनी दिल्या आहेत. तसेच मा.मुख्य सचिव महोदय यांनी उपरोक्त निर्देशाचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत सूचना दिल्या आहेत.

**०२.** तसेच मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली येथे U.P.AVAS EVAM VIKAS PARISHAD यांच्या विरुध्द राजेंद्र कुमार बारजात्या व इतर यांनी दिवाणी याचिका क्र.१४६०४/२०२४ तर राजीव गुप्ता व इतर यांनी दिवाणी याचिका क्र.१४६०५/२०२४ दाखल केली आहे. सदर याचिकेच्या संदर्भात दि.१७ डिसेंबर,२०२४ रोजी मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली यांनी अनधिकृत बांधकामावर कारवाई करण्यासंदर्भात यापूर्वी दिलेल्या निर्देशासह अधिकचे निर्देश दिले आहेत. सदरचे निर्देश शासन परिपत्रकान्वये सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांना कळविण्याच्या सूचना प्रबंधक, मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांनी दिल्या आहेत. तसेच मा.मूख्य सचिव महोदय यांनी उपरोक्त निर्देशाचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे आणि तसे करण्यात कसूर झाल्यास कसूर करण्याऱ्या अधिकाऱ्यावर कारवाई करण्यात येईल, अशा सूचना दिल्या आहेत.

**०३.** मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली यांनी दि.१३ नोंव्हेंबर, २०२४ व दि.१७ डिसेंबर,२०२४ रोजी दिलेले निर्देश व त्या निर्देशाच्या संदर्भात मा.मुख्य सचिव महोदय यांनी दिलेल्या सूचना शासन परिपत्रकान्वये राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कळविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रकः-**

मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली यांनी रिट याचिका (दिवाणी) क्र.२९५/२०२२, रिट याचिका (दिवाणी) क्र.३२८/२०२२ व रिट याचिका (फौजदारी) क्र.१६२/२०२२ संदर्भात दि.१३ नोव्हेंबर,२०२४ रोजी दिलेले निर्देश तसेच दिवाणी याचिका क्र.१४६०४/२०२४, दिवाणी याचिका क्र.१४६०५/२०२४ संदर्भात दि.१७ डिसेंबर,२०२४ रोजी दिलेल्या निर्देशांचे व मा.मुख्य सचिव यांनी दिलेल्या निर्देशाचे तंतोतंत पालन राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावे. तसेच उपरोक्त निर्देशांचे पालन करीत असताना, अनधिकृत बांधकामावरील कार्यवाहीसाठीचे प्रचलित कायदे/नियम/शासन निर्णय यामधील तरतुदींची तंतोतंत अंमलबजावणी होईल, याबाबतची संपूर्ण खात्री करण्यात यावी. तसेच मा.सर्वोच्च न्यायालय,दिल्ली यांच्या आदेशाचा अवमान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

**०२.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०४२५१२२०३८७५२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJINKYA VASANT BAGADE

Digitally signed by AJINKYA VASANT BAGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Urban Development Department, 2.5.4.20=c2c536d8c69638eb0722b58787e3271291abd492dd102db87dd9f19890bb74ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6c08d792cf36e8c4debdaff51291af7fa70ad1cabea48c176da37b5a461cb674, cn=AJINKYA VASANT BAGADE
Date: 2025.04.25 12:22:03 +05'30'

**( अजिंक्य बगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव कार्यालय,मंत्रालय,मुंबई-३२.
२) प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय , मुंबई-३२
४) आयुक्त, सर्व महानगरपालिका
५) आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई
६) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद / नगरपंचायती
७) सहायक निबंधक,मा.सर्वोच्च न्यायालय,नवी दिल्ली (पत्राने)
८) निवडनस्ती (नवि-२०